**भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर (अनुसूचित जाती जमाती) उद्योजकांसाठी विशेष सामुहिक प्रोत्साहन योजनेतंर्गत प्रशिक्षणासाठी M/s. Central Institute of Plastics Engineering & Technology (CIPET) या संस्थेची नियुक्ती करुन प्रशिक्षणार्थीसाठी पायाभूत सुविधांकरीता महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडे निधी वर्ग करण्याबाबत...**

# महाराष्ट्र शासन

## उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग

**शासन निर्णय क्र. साप्रोयो-२०१६/प्र.क्र. ३४२ /उद्योग-८,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक - २९ मार्च, २०१७

**वाचा:-** १) शासन निर्णय क्र.साप्रोयो-२०१५/ प्र.क्र.१३३/ उद्योग-८ दिनांक ११/२/२०१६
२) शासन निर्णय क्र. साप्रोयो-२०१५/प्र.क्र.१३३/ उद्योग-८ दिनांक ११/५/२०१६
३) शासन परिपत्रक क्र.पूरक -२०१६ /प्र.क्र.१२८ /अर्थसंकल्प-३,दि. १२/८/२०१६.
४) शासन निर्णय क्र.पूरक-२०१६/(प्र.क्र. ५९)/ प्रशासन-१, दिनांक २०/८/२०१६.
५) उद्योग संचालनालयाचे पत्र क्र. उ.सं/साप्रोयो /विप्रोयो/पा.भू.सुविधा निधी/२०१६/ अे-१४०३,दिनांक २१/१२/२०१६.
६) दिनांक ०७/०३/२०१७ रोजीची बैठक.

**प्रस्तावना:-**

शासनाने अनुसूचित जाती व अनुसूचित जमातीच्या उद्योजकांसाठी भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर (असुसूचित जाती व अनुसूचित जमाती) विशेष सामुहिक प्रोत्साहन योजना संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये जाहीर केली आहे. संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये सदर योजनेच्या खर्चासाठी सामाजिक न्याय विभागाकडून सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात पुरवणी मागणीद्वारे रु. ५६ कोटी निधी उपलब्ध करुन देण्यात आला आहे. भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर (अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती) उद्योजकांसाठी विशेष सामुहिक प्रोत्साहन योजनेतील (शासन निर्णय क्र. साप्रोयो २०१५/प्र.क्र.१३३/उद्योग-८, दि. ११/०२/२०१६) परि. क्र. ११ अंतर्गत देण्यात येणाऱ्या "पायाभूत सुविधांचा विकास" करीता एकूण रु. ३० कोटी अर्थसंकल्पीत करण्यात आलेली आहे. (सामाजिक न्याय विभागाकडून रु. २० कोटी व आदिवासी विकास विभागाकडून रु. १० कोटी ) सदर निधी केंद्र शासन व राज्य शासन सहाय्यीत समुह औद्योगिक विकास गट योजनेतील अत्यावश्यक पायाभूत सुविधांसाठी (रस्ते, वीज, पाणी, सामुहिक प्रक्रीया केंद्र व चाचणी केंद्र) या प्रयोजनाकरीता वापरण्यात येणार आहे.

उद्योग संचालनालयाने दि. २१/१२/२०१६ च्या पत्रान्वये M/s. Central Institute of Plastics Engineering & Technology (CIPET) यांना ३०० ते ५०० प्रशिक्षणार्थी प्रतीवर्ष प्रमाणे सुविधा केंद्राच्या इमारतीच्या बांधकामासाठी रु. ५ कोटी व सामायीक सुविधा प्रयोगशाळेसाठी रु. ४.३० कोटी म्हणजेच एकूण रु. ९.३० कोटी देय करण्यासाठी एम.आय.डी.सी. ला वर्ग करण्याचे प्रस्तावित केले आहे. उद्योग संचालनालयाच्या प्रस्तावाच्या अनुषंगाने खालील प्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे :-

**शासन निर्णय-**

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर (अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती) उद्योजकांसाठी विशेष सामुहिक प्रोत्साहन योजनेतील पायाभूत सुविधांच्या विकासाअंतर्गत उद्योजकांकरीता प्रशिक्षण केंद्र व होस्टेल निर्मितीसाठी M/s. Central Institute of Plastics Engineering & Technology, औरंगाबाद या संस्थेची नियुक्ती करण्यात येत आहे. तसेच या संस्थेस अनुसूचित जाती /जमातीच्या प्रशिक्षणार्थींना (३०० ते ५०० प्रशिक्षणार्थी प्रती वर्ष) प्रशिक्षण केंद्र, होस्टेल इ. पायाभूत सुविधा निर्माण करण्याकरीता रु. ९.३० कोटी (अक्षरी रु. नऊ कोटी तीस लक्ष फक्त) निधी उपलब्ध करण्यासाठी सन १७-२०१६ या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध तरतुदीतून रु .९.३० कोटी (अक्षरी रु. नऊ कोटी तीस लक्ष फक्त) इतका निधी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळास वळता करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे. M/s. Central Institute of Plastics Engineering & Technology, औरंगाबाद या संस्थेने अनुसूचित जाती/जमातीच्या लाभार्थींचे प्रमाण ५०% पेक्षा जास्त ठेवणे बंधनकारक आहे.

२. सदर रक्कम अदा करण्यासाठी सन २०१६-२०१७ च्या पावसाळी अधिवेशनामध्ये पुरवणी मागणीद्वारे निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला असून या विभागाच्या अर्थसंकल्प कक्षाकडून संदर्भ क्र ३ . येथील शासन निर्णयान्वये पुरवणी मागणीद्वारे मंजूर झालेली सदर रक्कम नियंत्रक अधिकाऱ्याकडे सुपूर्द करण्यात आली आहे.

३. सदरची तरतूद आहरित करण्यासाठी लेखाधिकारी, उद्योग संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी व विकास आयुक्त (उद्योग) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर निधीच्या विनियोगाबाबत तसेच महालेखापाल यांच्या लेख्याशी खर्च ताळमेळ घालण्याची कार्यवाही करावी. सदर निधी प्रत्यक्षात वितरित झाल्यानंतर खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल यांना पाठवून त्याची प्रत शासनास सादर करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकाऱ्याची राहील.

४. सदर रकमेपोटी होणारा खर्च “मागणी क्र. के-७, मुख्य लेखाशीर्ष-२८५२, उद्योग ८०, सर्वसाधारण, ७८९, अनुसुचित जाती उपयोजना, (०१) (०१) अनूसूचित जातीच्या उद्योजकांसाठी भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर प्रोत्साहन योजना (योजनांतर्गत) २८५२ ए ००४ ) ” या लेखाशीर्षाखाली सन २०१६-२०१७ या आर्थिक वर्षातील मंजूर केलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उप विभाग ४मधील खर्चाच्या संकिर्ण बाबीसंबंधी प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार अनुक्रमांक -१३४ अनुसार व वित्त विभागाचे परिपत्रक क्र. पुरक २०१६/प्र.क्र.१२८/ अर्थ-३ दिनांक १२/८/२०१६ व अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३ दिनांक २०/४/२०१६ मधील परिच्छेद ७ (अ) (ब) (क) व परिच्छेद ८ अनुसार प्रशासकिय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

६. प्रमाणित करण्यात येते की, सदर शासन निर्णयातील निधी वितरित करताना वित्त विभागाचे परिपत्रक क्र. क्र. अर्थसं २०१६/ प्र.क्र. ८९/ अर्थ-३ दिनांक २०/४/२०१६ मधील परिच्छेद ७ (अ) (ब) (क) व परिच्छेद ८, ९ व १४ येथे नमूद अटींची पुर्तता होते. सदर परिपत्रकातील परिच्छेद क्र. १०, ११,१३,१५,१७ व १८ येथील अटी या योजनेस लागू होत नाहीत. तसेच वित्त विभागाच्या सदर परिपत्रकासोबत असलेल्या परिशिष्ट मधील अ.क्र. ९ येथे नमूद तपासणी सुचीचा अवलंब करण्यात आलेला आहे.

७. सदर शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष साहाय्य विभागाची टिप्पणी अनौपचारीक सं.क्र.६८/विघयो, दि. २२/०३/२०१७ च्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१७०३३०१०५७१९३६१० असा आहे. हा आदेश डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नावाने.

Shraddha Deven Kocharekar

Digitally signed by Shraddha Deven Kocharekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=IELD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=189da489d797e1e6a67b7d97496ef70683916299eab51c867c5a13147d142a80, cn=Shraddha Deven Kocharekar
Date: 2017.03.30 10:58:51 +05'30'

**( श्रध्दा कोचरेकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. विकास आयुक्त ( उद्योग ), उद्योग संचालनालय, मुंबई-३२.
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
३. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा ), महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपूर.
४. व्यवस्थापकीय संचालक, IDBI Venture Capital Fund Ltd.मुंबई.
५. संचालक, लेखा व कोषागारे, संगणक शाखा, नवीन प्रशासन भवन, मुंबई-३२.
६. सहायक संचालक, (वित्त व लेखा), उद्योग संचालनालय, मुंबई.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई, /निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
८. उपसचिव ( प्रशासन), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. कक्ष अधिकारी, प्रशासन-१, उ.ऊ. व का.वि., मंत्रालय, मुंबई-३२.
१०. M/s. Central Institute of Plastics Engineering & Technology, औरंगाबाद
११. निवड नस्ती ( उद्योग-८).